शासनाच्या विविध विभागांकडून महाराष्ट्र मूल्यवर्धित कर अधिनियम, २००२ खाली मूल्यवर्धित कराची सूट न देणेबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांक-मुवक-१५१०/प्र.क्र. १५३/कराधान-१,
मंत्रालय,मुंबई-४०००३२,
दिनांक: 16 MAR 2011

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्रात दिनांक १ एप्रिल २००५ पासून मूल्यवर्धित कर प्रणाली लागू करण्यात आलेली आहे. निरसीत झालेल्या मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९ मध्ये संस्था, व्यापारी किंवा व्यक्ती यांना विक्रीकराची माफी देण्याची तरतूद होती. परंतु मूल्यवर्धित कर प्रणालीनुसार अशी माफी न देण्याचे तत्व राष्ट्रीय पातळीवरील राज्याच्या वित्त मंत्र्यांच्या शक्तीप्रदत्त समितीने राष्ट्रीय सहमतीने स्विकारले होते त्यानुसार राज्यांनी मूल्यवर्धित कर अधिनियमामध्ये मूल्यवर्धित कराची माफी देण्याची तरतूद करण्यात आलेली नाही. मूल्यवर्धित कराची अंमलबजावणी राज्यात चालू असतांना आता असे निदर्शनास येत आहे की, शासनाचे विविध विभाग मूल्यवर्धित कराची माफी जाहीर करणारे शासन निर्णय प्रस्तावित करीत आहेत. अशा शासन निर्णयास वित्त विभागाची सहमती देणे शक्य नसल्यामुळे व त्याची अंमलबजावणी करणे शक्य नसल्याने अशी प्रकरणे पुढे न्यायालयात जात आहेत. या पार्श्वभूमीवर सुयोग्य असा निर्णय घेण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र मूल्यवर्धित कर अधिनियम, २००२ मध्ये मूल्यवर्धित करात माफी देण्याची तरतूद नसल्याने सर्व संबंधित विभागांनी अशा करमाफीचे प्रस्ताव विचारार्थ घेऊ नयेत किंवा वित्त विभागाकडे पाठवू नयेत. विभागाला कोणत्याही योजनेत सूट देणे अनिवार्य वाटत असल्यास मंत्रिमंडळाची विहीत पध्दतीने मान्यता घेऊन अर्थसंकल्पीय तरतूद करुन अनुदान स्वरुपाने अशा बाबीची पूर्तता करावी. कोणत्याही परिस्थितीत मूल्यवर्धित कर पध्दतीत प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष सुटीचे प्रस्ताव विचारार्थ घेऊ नयेत.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.Maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०११०३१६२२१९५१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(सुधीर श्रीवास्तव )**
**प्रधान सचिव (वित्त)**

प्रत:- माहितीसाठी,

१) मा. राज्यपालांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३) मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव.
४) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
५) सर्व मा. मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सचिव,
६) सर्व विधानसभा/विधान परिषद, सदस्य,
७) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
८) विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, ८ वा मजला, माझगांव, मुंबई-४०००१०.(१० प्रती).
९) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
१०) सर्व उप सचिव/अवर सचिव, वित्त विभाग.
११) निवड नस्ती, कराधान-१.